**राज्यातील राज्य शासकीय/निमशासकीय/ महामंडळातील अधिकारी/कर्मचारी यांच्यासाठी अनुकंपा धोरण सुधारणेआणि त्याचबरोबर प्रकल्पग्रस्तांना शासकीय नोक-यांमध्ये भरती करण्यासंबंधी आढावा घेणे व त्यानुषंगाने प्रभावी उपाययोजना सूचविण्यासाठी मंत्रीमंडळ उपसमिती गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः अकंपा -१२१५/प्र.क्र. १२७ /आठ.**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड

मंत्रालय, मंबई ४०० ०३२.

तारीख: २० जून, २०१५.

**प्रस्तावना :-**

राज्यातील राज्य शासकीय कर्मचा-यांसाठी अनुकंपा नियुक्तीबाबतचे सुधारीत प्रस्ताव दिनांक ९/६/२०१५ रोजी मंत्रीमंडळासमोर विचारार्थ सादर केला असता शासनाने सदर प्रकरणी राज्यातील राज्य शासकीय कर्मचा-यांबरोबरच नगरपालिका, महानगरपालिका, जिल्हा परिषदा, महामंडळे इ. मधील अधिकारी/कर्मचारी यांच्यासाठी सध्याचे अनुकंपा धोरण सुधारणे आणि त्याचबरोबर प्रकल्पग्रस्तांना किंवा त्यांच्या वारसांना शासकीय सेवेत सरळसेवेने नियुक्ती देण्यासंबंधी प्रभावी उपाययोजना सुचविण्याबाबत मा. वित्तमंत्री, महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखाली मंत्रीमंडळ उपसमिती स्थापन करावी . उपसमितीने या विषयाचा अभ्यास करुन पुढील कार्यवाहीचा अहवाल २ महिन्यात सादर करण्यात यावा, असे निदेशित केले आहे.

**शासन निर्णय:-**

त्यानुसार राज्यातील राज्य शासकीय/निमशासकीय/ महामंडळे अधिकारी/कर्मचारी यांच्यासाठी अनुकंपा धोरण सुधारणे आणि त्याचबरोबर प्रकल्पग्रस्तांकरिता प्रभावी उपाययोजना सुचविण्यासाठी खालीलप्रमाणे मंत्रीमंडळ उपसमिती गठीत करण्यात येत आहे :-

| | | |
|---|---|---|
| १. | मा. श्री. सुधीर मुनगंटीवार, मंत्री, वित्त व नियोजन व वने | अध्यक्ष |
| २. | मा. श्री. विनोद तावडे, मंत्री, शालेय शिक्षण, क्रिडा व युवक कल्याण,उच्च व तंत्र शिक्षण, वैद्यकीय शिक्षण, मराठी भाषा, सांस्कृतीक कार्य, | सदस्य |
| ३. | मा. श्री. गिरीश बापट, मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण, अन्न व औषध प्रशासन, संसदीय कार्य | सदस्य |
| ४. | मा. डॉ. दिपक सावंत, मंत्री, सार्वजनिक आरोग्य आणि कुटूंब कल्याण | सदस्य |
| ५. | अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग | सदस्य सचिव |

२. मंत्रीमंडळ उपसमितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे :-

१) राज्यातील शासकीय अधिकारी/कर्मचारी यांच्यासाठी सध्याचे अनुकंपा धोरणाच्या अंमलबजावणीची सद्य:स्थिती, अडचणी याबाबतचा आढावा घेणे.

२) शासकीय कर्मचा-याशिवाय नगरपालिका, महानगरपालिका, जिल्हा परिषदा महामंडळे इ. चे अधिकारी/कर्मचारी यांच्यासाठीच्या अनुकंपा धोरणाच्या अंमलबजावणीची सद्य:स्थिती, अडचणी याबाबतचा देखील आढावा घेणे.

३) प्रकल्पग्रस्तांसाठी शासकीय नोक-यांमध्ये भरती करण्याच्या धोरणाचा/आरक्षणाचा आढावा घेणे.

४) उपरोक्त (१) व (२) च्या अनुषंगाने घेतलेल्या अनुकंपा धोरणाच्या आढाव्याच्या आधारे भविष्यकाळात अनुकंपा धोरण काय असावे, हे सुचविणे.

५) प्रकल्पग्रस्तांना शासकीय सेवांमध्ये योग्य प्रमाणात सामावून घेण्याकरिता व इतर मार्गातून मदतीची प्रभावी उपाययोजना सुचविणे.

३. सदर समितीने आपला अहवाल २ महिन्याच्या आत सादर करावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६२२१६३३५९२४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Surve Rajendra K

Digitally signed by Surve Rajendra K
DN: c=IN, o=Mantralaya Canteen, ou=Mantralaya Canteen, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Surve Rajendra K
Date: 2015.06.22 16:36:05 +05'30'

( राजेंद्र सुर्वे )

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव

२) मा. मंत्री, वित्त व नियोजन व वने यांचे खाजगी सचिव

३) मा. मंत्री, शालेय शिक्षण, क्रिडा व युवक कल्याण, उच्च व तंत्र शिक्षण, वैद्यकीय शिक्षण, मराठी भाषा, सांस्कृतीक कार्य यांचे खाजगी सचिव

४) मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण, अन्न व औषध प्रशासन, संसदीय कार्य यांचे खाजगी सचिव

५) मा. मंत्री, सार्वजनिक आरोग्य आणि कुटूंब कल्याण यांचे खाजगी सचिव

६) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई यांचे वरिष्ठ स्विय सहायक

७) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे वरिष्ठ स्विय सहायक

८) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे वरिष्ठ स्विय सहायक

९) प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई

१०) प्रधान सचिव (२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

११) प्रधान सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई सचिव,

१२) प्रधान सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई

१३) सचिव, सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन-१६अ, मंत्रालय, मुंबई

१४) सचिव, मदत व पुनर्वसन विभाग, मंत्रालय, मुंबई

१५) निवड नस्ती/का-८